आयडॉल शिक्षक व शैक्षणिक संस्था,
शाळा बँक तयार करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांक :- संकीर्ण-२०२५/प्र.क्र.१४/टीएनटी-४**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार भवन, मुंबई ४०० ०३२.
दिनांक :- १६ एप्रिल, २०२५

**संदर्भ :** शिक्षण संचालक (माध्यमिक व उच्च माध्यमिक) महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र क्र. आस्था-क माध्य/आयडॉल शिक्षक बॅक/२०२५/०१७८१ दिनांक ३१ मार्च, २०२५.

**प्रस्तावना :-**

राज्यातील प्रत्येक मुलास दर्जेदार व गुणवत्ता पुर्ण शिक्षण देण्याची जबाबदारी राज्य शासनाची आहे. याकरीता राज्यात विविध प्रकारचे उपक्रम व धोरणांची अंमलबजावणी केली जाते. राज्यातील प्रत्येक मुलांस गुणवत्तापूर्ण शिक्षण देण्यासाठी राज्य शासनाद्वारे विविध प्रकारच्या शाळा चालविल्या जातात. काही शाळा शासनाद्वारे स्थानिक स्वराज्य संस्था व खाजगी व्यवस्थापन द्वारे शाळा चालविल्या जातात. दर्जेदार, गुणवत्तापूर्ण, संपूर्ण आयुष्य शाळा व विद्यार्थी विकासाकरीता देणाऱ्या शिक्षकांच्या अनुभवाचा उपयोग राज्यातील अन्य शाळांना, शिक्षकांना, विद्यार्थ्यांना व पालकांना व्हावा तसेच सर्व शाळांमधील शिक्षकांना प्रोत्साहित करण्यासाठी राज्यातील शाळांमधील दर्जेदार व गुणवत्तापूर्ण काम करणा-या शिक्षकांना त्यांच्या दर्जेदार कामाबद्दल प्रोत्साहित करणे आवश्यक आहे. या शिक्षकांच्या कामाचा गौरव व सन्मान करण्यासाठी विशेष मोहीम हाती घेणे योग्य राहील.

तसेच राज्यात २१ व्या शतकातील नविन आव्हाने व शैक्षणिक गुणवत्ता वाढ यासाठी राज्य शासन, विविध योजना कार्यान्वित करीत आहे. या योजनांमुळे विद्यार्थ्यांच्या शैक्षणिक प्रगतीस हातभार लागत आहे. राज्यातील शाळा, शैक्षणिक संस्था मोठ्या उत्साहाने केंद्र शासन व राज्य शासनाच्या विविध कार्यक्रम/उपक्रम राबवित आहेत. या सोबत शैक्षणिक गुणवत्ता वाढीस त्याच्या पातळीवर गुणवत्तापूर्ण उपक्रम राबवित असल्याचे निर्देशनास येत आहे. या उपरोक्त पार्श्वभूमीवर राज्यातील सृजनशील, गुणवत्तापूर्ण, आनंददायी शिक्षण, दर्जेदार शिक्षण, खेळ नैपूण्य, वाङःमयीन व सांस्कृतिक मूल्यांचे विकसन इ. मध्ये शाळा, शैक्षणिक संस्था यांचे भरीव योगदान असल्याचे दिसून येते. गुणवत्तापूर्ण कार्य करणाऱ्या शैक्षणिक संस्थांचा व शाळांचा गौरव व सन्मान व्हावा ही अपेक्षा जनतेची आहे. त्याअनुषंगाने “आयडॉल शिक्षक व शैक्षणिक संस्था,शाळांची” बँक तयार करण्यासंदर्भात खालील प्रमाणे कार्यवाही करण्याबाबत प्रस्तावित करण्यात येत आहे. याकरीता तालुकास्तर, जिल्हास्तर, विभागस्तर, राज्यास्तर समितीने राज्यातील उत्तम दर्जाच्या काम करणा-या आयडॉल शिक्षकांची व शैक्षणिक संस्थां,शाळांची बँक तयार करणे साठी समित्या स्थापन करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

तालुकास्तर, जिल्हास्तर, विभागस्तर, राज्यास्तर समितीने राज्यातील उत्तम दर्जाच्या काम करणा-या आयडॉल शिक्षकांची व शैक्षणिक संस्था, शाळांची बँक तयार करणे साठी खालील प्रमाणे समित्या स्थापन करण्यात येणार आहे.

**अ) समिती:-**

१) तालुकास्तर समिती:-

| अ.क्र. | सद्याच्या कार्यरत पदाचे पदनाम | पदनाम समिती प्रमुख |
|---|---|---|
| अ | गटशिक्षणाधिकारी | समिती प्रमुख |
| ब | जिल्हा शिक्षण प्रशिक्षण संस्था अधिव्याख्याता | सदस्य |
| क | शिक्षण तज्ञ | सदस्य |
| ड | दोन उत्तम दर्जाचे काम करणारे केंद्र प्रमुख | सदस्य |
| इ | विस्तार अधिकारी | सदस्य सचिव |

२ ) जिल्हास्तर समिती:-

| अ.क्र. | सद्याच्या कार्यरत पदाचे पदनाम | समिती पदनाम |
|---|---|---|
| अ | जिल्हाधिकारी | समिती प्रमुख |
| अ | मुख्य कार्यकारी अधिकारी | समिती उपप्रमुख |
| ब | प्राचार्य,जिल्हा शिक्षण व प्रशिक्षण संस्था | सदस्य |
| क | शिक्षणाधिकारी प्राथमिक | सदस्य |
| ड | शिक्षणाधिकारी माध्यमिक | सदस्य |
| इ | दोन शिक्षण तज्ञ | सदस्य |
| ई | ज्येष्ठ अधिव्याख्याता | सदस्य सचिव |

३) राज्यस्तरीय समिती:-

| अ.क्र. | सद्याच्या कार्यरत पदाचे पदनाम | पदनाम |
|---|---|---|
| अ | आयुक्त (शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे | समिती प्रमुख |
| ब | संचालक, राज्य शैक्षणिक संशोधन व प्रशिक्षण परिषद, महाराष्ट्र राज्य, पुणे | समिती उपप्रमुख |
| क | दोन शिक्षण तज्ञ | सदस्य |
| ड | शिक्षण संचालक, (प्राथमिक/माध्यमिक उच्च माध्यमिक), पुणे | सदस्य |
| इ | उपसंचालक, राज्य शैक्षणिक संशोधन व प्रशिक्षण परिषद, महाराष्ट्र राज्य, पुणे | सदस्य |
| ई | सहसंचालक, राज्य शैक्षणिक संशोधन व प्रशिक्षण परिषद, महाराष्ट्र राज्य, पुणे | सदस्य सचिव |

**निमंत्रित सदस्य:-** शासनास/समिती प्रमुखास आवश्यक वाटल्यास वरील प्रत्येक समितीमध्ये निमंत्रित सदस्य घेऊ शकतील.

**ब) आयडॉल शिक्षक व आयडॉल शैक्षणिक संस्था, शाळांची निवड करणे-**

शिक्षक, शैक्षणिक संस्था ,शाळांची निवड करतांना हे युडायस, स्कॉफ पोर्टल (SQAAF) सरल, मित्रा, दिशा ॲप, प्रत्यक्ष शाळा भेटी/निरीक्षण इत्यादी मधील माहितीच्या आधारे करण्यात यावे तसेच खालील बाबींचा निवड करतांना विचार करण्यात यावा.

I. मुलांच्या अध्ययनासाठी नव्या पद्धतींचा स्विकार करणे.

II. शासकीय ध्येय धोरणाची प्रभावी अंमलबजावणी करणे.

III. SQAAF मधील शाळा प्रगती, “मुख्यमंत्री माझी शाळा, सुंदर शाळा” मधील भूमिका.

IV. विद्यार्थी अध्ययन निष्पत्ती स्तर.

V. स्थानिक जनतेचा शाळा विकासातील सहभाग.

VI. शिष्यवृत्ती, कला, क्रीडा, सांस्कृतिक, वाङ:मयीन, उच्च शिक्षणातील सहभाग इत्यादीबाबत विद्यार्थ्यांची प्रगती.

VII. नाविन्यपुर्ण उपक्रमाचा उपयोग शालेय कामकाजामध्ये करणे.

VIII. मागील वर्षाच्या तुलनेत चालु वर्षातील शाळेची/ वर्गाची वाढलेली पटसंख्या.

IX. मागील पाच ते सात वर्षात शाळांमधील वाढलेली पट संख्या.

X. आनंददायी शिक्षणाचा प्रयोग.

XI. दैनिक विद्यार्थी उपस्थिती प्रमाण, शाळा बाह्य विद्यार्थी रहीत गाव/वाडी/वस्ती/वॉर्ड इ. करीता केलेले प्रयत्न.

XII. शिक्षकांच्या आचार विचार पध्दती

तथापि, शिक्षक,शैक्षणिक संस्था, शाळा याच्यांकडून कोणतेही अर्ज, कागदपत्रे अथवा सादरीकरण घेऊ नये. समितीने वरील मुद्यांचा विचार करुन शिक्षक,शैक्षणिक संस्था,शाळा यांची निवड करावी.

**क) मूल्यमापन :-**

**(१) आयडॉल शिक्षकांची मूल्यामापन करताना या बाबींचा विचार करावा-**

सर्व स्तरावरील समितीने मूल्यमापनाकरीता पुढील बाबी व गुणांकनाचा विचार करावा. १०० गुणांच्या आधारे मूल्यमापन करणे योग्य राहील. यथावकाश आवश्यकतेनुसार सविस्तर सूचना राज्य शैक्षणिक संशोधन व प्रशिक्षण परिषद, पुणे यांनी निर्गमित कराव्यात.

I. विद्यार्थ्यांच्या इयत्ता निहाय अध्ययन निष्पतीच्या कामगिरीस उच्चतम करीता ६० गुणांच्या आधारे शिक्षकांच्या कामाचे मूल्यमापन करावे.

II. शिक्षकांच्या शारीरिक व मानसिक आरोग्याकरीता ५ गुणांकन देण्यात यावे.

III. शिक्षकांच्या कामामुळे तालुका, जिल्हा, विभाग, राज्य/आंतरराष्ट्रीय स्तरावरील विविध परीक्षा / स्पर्धा / घटना मध्ये विद्यार्थ्यांच्या सहभागासाठी/कामगिरी/यशस्वीता इ.करीता केलेल्या कामाकरीता ५ गुण देण्यात यावे.

IV. शालेय अभ्यासक्रमाच्या व्यतिरिक्त अन्य पुस्तकांचे वयानुरुप वाचन मुलांनी करण्यासाठी शिक्षकांचे प्रयत्न असल्यास ५ गुणांच्या मर्यादेत गुण देण्यात यावे.

V. शिक्षकांची शालेय दैनिक उपस्थितीचे प्रमाणास ५ गुण देण्यात यावे.

VI. शालेय स्वच्छता व शालेय परिसरात, वृक्ष संवर्धन, परसबाग विकसनाच्या कार्यामधील सहभागास ५ गुण देण्यात यावे.

VII. विद्यार्थी अध्ययन निष्पती बाबत पालकांमध्ये जनजागृती करण्यासाठी केलेले प्रयत्न या करीता ५ गुण देण्यात यावे.

VIII. शिक्षकांनी मागील ५ वर्षात घेतलेल्या विविध प्रशिक्षण, अभ्यासक्रम, इ. करीता ५ गुण देण्यात यावे.

IX. राष्ट्रीय व राज्य पातळीवरील महत्त्वपूर्ण योजना / कार्यक्रमांचा प्रचार-प्रसार जन सामान्यांमध्ये /विद्यार्थ्यांमध्ये करण्यासाठी केलेले प्रयत्न याकरीता ५ गुण देण्यात यावे.

**(२) आयडॉल शैक्षणिक संस्था व शाळा मूल्यमापन करताना या बाबींचा विचार करावा-**

सर्व स्तरावरील समितीने मूल्यमापनाकरीता पुढील बाबी व गुणांकनाचा विचार करावा. १०० गुणांच्या आधारे मूल्यमापन करणे योग्य राहील. यथावकाश आवश्यकतेनुसार सविस्तर सूचना राज्य शैक्षणिक संशोधन व प्रशिक्षण परिषद, पुणे यांनी निर्गमित कराव्यात.

"मुख्यमंत्री माझी शाळा, सुंदर शाळा" व स्कॉफ (SQAAF) मधील प्राप्त गुणांच्या सरासरीला उच्चमतम २० गुण देता येतील. येणेप्रमाणे जास्त १) ९५ पेक्षा जास्त गुणांकन असल्यास **२० गुण** २) ९० ते ९४.९९ गुणांकन असल्यास **१५ गुण** ३) ८५ ते ८९.९९ गुणांकन असल्यास **१० गुण** ४) ८० ते ८४.९९ गुणांकन असल्यास **०५ गुण** ५) ७० ते ७९.९९ गुणांकन असल्यास **०५ गुण** ६) ६९.९९ पेक्षा कमी गुणांकन असल्यास **०० गुण.**

I. विद्यार्थ्यांच्या इयत्ता निहाय अध्ययन निष्पतीच्या कामगिरीस उच्चतम करीता २० गुणांच्या आधारे शैक्षणिक संस्था व शाळांच्या कामाचे मूल्यमापन करावे.
II. शैक्षणिक संस्था व शाळा यांच्या स्वच्छता व निटनेटकेपणा करीता ५ गुण देण्यात यावे.
III. शैक्षणिक संस्था व शाळा यांच्या कामामुळे तालुका, जिल्हा, विभाग, राज्य/आंतरराष्ट्रीय स्तरावरील विविध परीक्षा/स्पर्धा/घटना मध्ये विद्यार्थ्यांच्या सहभागासाठी/कामगिरी/यशस्वीता इ.करीता केलेल्या कामाकरीता ५ गुण देण्यात यावे.
IV. शालेय अभ्यासक्रमाच्या व्यतिरिक्त अन्य पुस्तकांचे वयानुरुप वाचन/संस्कार इ. करीता शैक्षणिक संस्था व शाळा यांचे प्रयत्न असल्यास ५ गुणांच्या मर्यादेत गुण देण्यात यावे.
V. शैक्षणिक संस्था व शाळा यांच्या शालेय व्यवस्थापनामधील सक्रीय सहभागाकरीता ५ गुण देण्यात यावे.
VI. शालेय परिसरात, वृक्ष संवर्धन, परसबाग विकसनाच्या कार्यामधील सहभागास ५ गुण देण्यात यावे.
VII. विद्यार्थी अध्ययन निष्पती बाबत पालकांमध्ये जनजागृती करण्यासाठी केलेले प्रयत्न या करीता ५ गुण देण्यात यावे.
VIII. शैक्षणिक संस्था व शाळा यांनी मागील ५ वर्षात घेतलेल्या विविध प्रशिक्षण, अभ्यासक्रम, इ. मधील सक्रीय सहभागाकरीता ५ गुण देण्यात यावे.
IX. शैक्षणिक संस्था व शाळा व राष्ट्रीय व राज्य पातळीवरील सर्व शैक्षणिक उपक्रम, योजना / कार्यक्रमांचा प्रचार-प्रसार इत्यादींचा जन सामान्यांमध्ये /विद्यार्थ्यांमध्ये करण्यासाठी केलेले प्रयत्न याकरीता ५ गुण देण्यात यावे.
X. शैक्षणिक योजना/उपक्रम व्यतिरिक्त अन्य विभागातील योजना/उपक्रम/कार्यक्रम राबविण्यामधील सहभाग/योगदान याकरीता ५ गुण देण्यात यावे.
XI. शैक्षणिक संस्था व शाळा यांनी अधिनस्त कर्मचारी यांच्या आस्थापना विषयक कामातील निटनिटकेपणा, पारदर्शकता, वेतनभत्ते, अभिलेखे, इ. करीता ५ गुण देण्यात यावे.
XII. विद्यार्थी विकासाकरीता उपयोगात आणलेल्या विविध योजना, लोकसहभाग व जनतेच्या प्रती असलेला सन्मान इ. करीता ५ गुण देण्यात यावे.
XIII. शालेय कामकाजाचे संगणकीकरण करण्यामधील सहभाग इ. करीता ५ गुण देण्यात यावे.

**ड) यंत्रणेची भूमिका -**

**(१) आयडॉल शिक्षकांच्या कार्याबाबत यंत्रणेची भूमिका -**

I. प्रशिक्षणाकरीता राज्य शैक्षणिक संशोधन व प्रशिक्षण परिषद व अन्य संस्थांना या आयडॉल शिक्षकांना मास्टर ट्रेनर म्हणून घ्यावे.

II. आयडॉल शिक्षक यांचे कामाचे चित्रिकरण, दस्त/अभिलेख इ. राज्य शैक्षणिक संशोधन व प्रशिक्षण परिषद, महाराष्ट्र राज्य, पुणे व जिल्हा शिक्षण व प्रशिक्षण संस्था यांनी वेळोवेळी करावे.(उदा.ऑडियो, व्हिडिओ, टेक्स्ट तयार करणे व संकेतस्थळावर प्रकाशित करणे.

III. शिक्षण परिषदांमध्ये आयडॉल शिक्षकांच्या नाविण्यपूर्ण /विशेष कार्याचा प्रचार-प्रसार करावा.

IV. संबंधित आयडॉल शिक्षकांचा समितीच्या बैठकामध्ये सन्मान करणे त्यांच्या कार्याचा लेखा-जोखा इ. बाबत तालुका/जिल्हा/विभाग स्तरावरील विद्यार्थी गुणवत्तेच्या विविध समित्यामध्ये या बाबत विचार - विमर्श करणे.

V. गट संमेलन/केंद्र संमेलन यामध्ये आयडॉल शिक्षकांचे उद्बोधन ठेवणे.

VI. आयडॉल शिक्षकांच्या उत्तम कार्याचा प्रचार - प्रसार राज्य शैक्षणिक संशोधन व प्रशिक्षण परिषद, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी करावी. सर्वोत्तम दर्जाच्या शिक्षकांच्या शाळांना इतर शाळांमधील शिक्षकांनी, शाळा व्यवस्थापन समिती सदस्य इत्यादींनी भेटी देणे, अधिकारी यांच्या भेटीचे नियोजन करणे.

**(२) आयडॉल शैक्षणिक संस्था व शाळांच्या कार्याबाबत यंत्रणेची भूमिका -**

I. राज्य शैक्षणिक संशोधन व प्रशिक्षण परिषद व अन्य संस्थांनी आयडॉल शैक्षणिक संस्था व शाळांना अन्य शाळांच्या भेटीचे नियोजन करणे अशा शाळांमधील शिक्षकांना व अन्य व्यवस्थापनातील सक्रिय सदस्य यांना पालिकांच्या शाळांमध्ये अध्यापन मार्गदर्शक म्हणून घ्यावे.

II. आयडॉल शैक्षणिक संस्था व शाळा यांचे कामाचे चित्रिकरण, दस्त/अभिलेख इ. राज्य शैक्षणिक संशोधन व प्रशिक्षण परिषद, महाराष्ट्र राज्य, पुणे व जिल्हा शिक्षण व प्रशिक्षण संस्था यांनी वेळोवेळी करावे. (उदा.ऑडियो, व्हिडिओ, टेक्स्ट तयार करणे व संकेतस्थळावर प्रकाशित करणे.)

III. शिक्षण परिषदांमध्ये आयडॉल शैक्षणिक संस्था व शाळांच्या नाविण्यपूर्ण/विशेष कार्याचा प्रचार-प्रसार करावा.

IV. आयडॉल शैक्षणिक संस्था व शाळांच्या सदस्यांचा विविध स्तरावरील समितीच्या बैठकामध्ये सन्मान करणे त्यांच्या कार्याचा लेखा-जोखा इ. बाबत तालुका/जिल्हा/विभाग स्तरावरील विद्यार्थी गुणवत्तेच्या विविध समित्यामध्ये या बाबत विचार - विमर्श करणे.

V. गट संमेलन/केंद्र संमेलन/शैक्षणिक परिषद इत्यादी. यामध्ये या शैक्षणिक संस्था व शाळांच्या प्रतिनिधींचे उद्बोधन ठेवणे.

VI. आयडॉल शैक्षणिक संस्था व शाळा यांच्या उत्तम कार्याचा प्रचार - प्रसार राज्य शैक्षणिक संशोधन व प्रशिक्षण परिषद, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी करावी. सर्वोत्तम दर्जाच्या शाळांना इतर शाळांमधील शिक्षकांनी, शाळा व्यवस्थापन समिती सदस्य, पालक इत्यादींनी भेटी देणे, अधिकारी यांच्या भेटीचे नियोजन करणे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेताक २०२५०४१६१६४२२२८२२१ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

TUSHAR VASANT MAHAJAN

Digitally signed by TUSHAR VASANT MAHAJAN
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SCHOOL EDUCATION AND SPORT DEPARTMENT, 2.5.4.20=19c6c23f510a80926e9b7ee5db235979452f3f9e89181 18634069a6cc7a22b9f, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=1A39CEF3C157B9EE6A2ABE5779ACF233682613 F7B9C335D6BF4877267695CECA, cn=TUSHAR VASANT MAHAJAN
Date: 2025.04.16 16:44:53 +05'30'

**( तुषार महाजन )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) आयुक्त (शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे
२) जिल्हाधिकारी सर्व
३)शिक्षण संचालक ((माध्यमिक व उच्च माध्यमिक), महाराष्ट्र राज्य,पुणे.
४) शिक्षण संचालक (प्राथमिक), महाराष्ट्र राज्य, पुणे.
५) संचालक, महाराष्ट्र राज्य शैक्षणिक संशोधन व प्रशिक्षण परिषद महाराष्ट्र राज्य, पुणे
६) संचालक (महाराष्ट्र राज्य पाठयपुस्तक निर्मिती व अभ्यासक्रम संशोधन मंडळ (बालभारती ),पुणे.
७) अध्यक्ष, महाराष्ट्र राज्य माध्यमिक व उच्च माध्यमिक शिक्षण मंडळ, पुणे
८) विभागीय शिक्षण उपसंचालक (सर्व).
९) शिक्षणाधिकारी (प्राथमिक/ माध्यमिक), जिल्हा परिषद (सर्व).
१०) सर्व शिक्षण निरीक्षक, बृहन्मुंबई.
११) शिक्षण प्रमुख / शिक्षणाधिकारी / प्रशासन अधिकारी सर्व महानगरपालिका,
१२) मा. मंत्री (शालेय शिक्षण) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
१३) मा. राज्य मंत्री (शालेय शिक्षण) यांचे विशेष कार्य अधिकारी, मंत्रालय, मुंबई.
१४) प्र.स.(शालेय शिक्षण) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
१५) निवडनस्ती (टीएनटी- ४)